**नैसर्गिक आपत्तीमुळे बाधीत शेतकऱ्यांना कर्जमाफी (राज्यस्तर) योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं- १११९/प्र.क्र.१४६/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२०

**वाचा :-** १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा ०८१९/प्र. क्र. ११५ (भाग-३)/ २-स, दि २३.०८.२०१९.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा ०८१९/प्र. क्र. ११५ (भाग-३)/ २-स, दि २७.०८.२०१९.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा ०८१९/प्र. क्र. ११५ /२-स, दि १२.०२.२०२०.
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र, पूरक-२०१९/प्र.क्र.११५/अर्थसंकल्प-३, दि.०३.०१.२०२०
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. पुरक १९१९/प्र. क्र. १०८/ २०१९ /१७स, दि ०४.०१.२०२०.

**प्रस्तावना :-**

राज्यात जुलै २०१९ ते ऑगस्ट २०१९ या कालावधीमध्ये अतिवृष्टीमुळे उद्भवलेल्या पूर परिस्थितीत बाधित झालेल्या आपदग्रस्तांना मदतीचा निर्णय घेण्याबाबत मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीची बैठक दि.१९.८.२०१९ व दि. ०३.०९.२०१९ रोजी मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये राज्यात जुलै २०१९ ते ऑगस्ट २०१९ या कालावधीमध्ये अतिवृष्टीमुळे व पुरामुळे बाधित झालेल्या जिल्हयातील बाधित शेतकऱ्यांचे पीक कर्ज माफ करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने शासन निर्णय दिनांक २३.०८.२०१९, दिनांक २७.०८.२०१९ व दिनांक १२.०२.२०२० निर्गमित करण्यात आला.

सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी नैसर्गिक आपत्तीमुळे बाधीत शेतकऱ्यांना कर्जमाफी (राज्यस्तर), (२४३५ ०१३३) या लेखाशिर्षाअंतर्गत ३३ अर्थसहाय्य या बाबी अंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील पुरवणी मागणीद्वारे मंजूर निधीमधून सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या मागणीनुसार सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीमधून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षात सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाकडील कार्यक्रम खर्चाच्या योजनेअंतर्गत मंजूर निधीपैकी रु. ३००.०० कोटी (रु. तीनशे कोटी फक्त) एवढा निधी नैसर्गिक आपत्तीमुळे बाधीत शेतकऱ्यांना कर्जमाफी (राज्यस्तर), (२४३५ ०१३३) या लेखाशिर्षाअंतर्गत ३३ अर्थसहाय्य या बाबी साठी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद खर्च करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात आले आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी.

३. सदरहू रक्कम मागणी क्रमांक व्ही-०२, २४३५-इतर कृषीविषयक कार्यक्रम, ६०-इतर, १०१ - शेतकऱ्यांच्या कर्जमाफीसाठी योजना, (००)(०२) नैसर्गिक आपत्तीमुळे बाधीत शेतकऱ्यांना कर्जमाफी (राज्यस्तर), (२४३५ ०१३३) ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५०/१४३१ दिनांक ३१/०१/२०२० अन्वये वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ८९/व्यय-२ दिनांक १०/०२/२०२० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००२१४१८११२२८३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.02.14 18:13:04 +05'30'

( रमेश शिंगटे )
**अवर सचिव तथा सहनिबंधक**
**सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-२, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
५) निवासी न लेखापरिक्षा अधिकारी, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
९) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय-२), / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अवर सचिव (कार्यासन १७-स), सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (कार्यासन २-स).